राज्यसेवा (मुख्य) परिक्षा - २०१६ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या मंत्रालयीन कक्ष अधिकारी, गट ब संवर्गातील उमेदवारांच्या परिविक्षाधीन प्रशिक्षण (सीपीटीपी-४/अ) कालावधी करिता अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत व वेतनाबाबत

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः कअस १३१९/प्र.क्र.०४/१४ब

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १९ जानेवारी, २०१९

संदर्भ:-

१) **शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.०१.२०१४**
२) **शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६**
३) **सा.प्र.वि.क्र.टिआरएन-०६१८/प्र.क्र.३३ (भाग-२)/सीपीटीपी, दि. ०१.०१.२०१९ रोजीचे पत्र**

प्रस्तावना:-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणा-या गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षांच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट ब संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा - २०१६ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम -४/अ मध्ये प्रशिक्षण घेणाऱ्या उमेदवारांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट ब संवर्गातील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा (मुख्य) परीक्षा -२०१६ च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम -४/अ मध्ये प्रशिक्षण घेणाऱ्या ०७ उमेदवारांसाठी रू.९३००-३४८००, ग्रेड वेतन रू. ४८००/- या वेतनश्रेणीत एकूण ०७ अधिसंख्य पदे दिनांक १६.०१.२०१९ ते २०.०१.२०२१ या कालावधीसाठी निर्माण करण्याकरिता शासन मंजूरी देत आहे.

२. सदर ०७ अधिसंख्य पदे सामान्य प्रशासन विभागाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

३. मंत्रालयीन कक्ष अधिकारी गट ब संवर्गातील सदर ०७ अधिसंख्य पदांच्या वेतनावर येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र.ए-४ २०५२-सचिवालय- सर्वसाधारण सेवा २०५२००२५ - ०१ वेतन" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा.

४. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-४/अ (सीपीटीपी-४/अ) अंतर्गत प्रशिक्षण घेणा-या मंत्रालयीन कक्ष अधिकारी - गट ब संवर्गातील ०७ उमेदवारांच्या परिविक्षाधीन कालावधीतील वेतनासंदर्भात पुढीलप्रमाणे आदेशित करण्यात येत आहे:-

अ) सीपीटीपी -४/अ अंतर्गत प्रशिक्षण घेणा-या मंत्रालयीन कक्ष अधिकारी - गट ब संवर्गातील ०७ प्रशिक्षणार्थी / परिविक्षाधीन उमेदवारांच्या वेतनासाठी अवर सचिव (कार्यासन - २६), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

ब) उपरोक्त ०७ परिविक्षाधीन कक्ष अधिका-यांना दिनांक १६.०१.२०१९ पासून नियमित वेतन प्रदान करण्यात यावे.

५. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११९१६२४५२७१०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2019.01.19 16:33:59 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
५. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर - ४४२ ४१०.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. अवर सचिव, का. क्र. सीपीटीपी/ सीपीटीपी ब/कार्यासन २६, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती.